**नवेगांव - नागझिरा आणि मेळघाट या दोन व्याघ्र प्रकल्पांर्तगत विशेष व्याघ्र संरक्षण दलाची स्थापना करण्यासाठी २२४ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : - डब्ल्यूएलपी ०३.१७/प्र.क्र. ६३ /फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०४ मार्च, २०१७

वाचावे :-

१. शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक :- डब्ल्यूएलपी-०३.१६/प्र.क्र.१०८/फ-१, दिनांक :- १४.१०.२०१६
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ह्यांचे पत्र कक्ष-३/योजनेतर/ प्र.क्र.५६/१६-१७/१८६० दि. ०३.०१.२०१७
३. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक :- पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दि. १०.०२.२०१७

शासन निर्णय :-

नवेगांव -नागझिरा आणि मेळघाट या दोन व्याघ्र प्रकल्पांर्तगत विशेष व्याघ्र संरक्षण दलाची स्थापना करण्यासाठी २२४ अस्थायी पदांना सन २०१६-१७ मध्ये संदर्भ क्रमांक ०१ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.१०.२०१६ ते दिनांक २८.०२.२०१७ पर्यत चालू ठेवण्यासाठी शासनाची मंजुरी प्रदान करण्यात आली आहे. आता अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ह्यांचे संदर्भीय पत्रान्वये सदर पदे ०१.०३.२०१७ ते २८.०२.२०१८ पर्यंत चालू ठेवण्याबाबत प्रस्ताव प्राप्त झाला आहे.

२. प्रशासकीय विभागाच्या आकृतिबंधातील समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०१७ ते दिनांक ३०.०९.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार शासन निर्णय संदर्भ क्र. ३ अन्वये प्रशासकीय विभागांना देण्यात आले आहेत.

३. परिच्छेद क्रमांक ३ मधील तरतूदीनुसार प्रशासकीय विभागाच्या नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांच्या आढाव्यास (नव्याने निर्माण केलेल्या पदांसह) कोणत्याही **३० एप्रिल, २०१७ अखेरपर्यंत** उच्च स्तरीय सचिव समितीची मान्यता घेऊन सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याच्या अटीवर नवेगांव -नागझिरा आणि मेळघाट या दोन व्याघ्र प्रकल्पांर्तगत विशेष व्याघ्र संरक्षण दलाची स्थापना करण्यासाठी **२२४ अस्थायी पदांना** दिनांक ०१.०३.२०१७ ते दिनांक ३०.०९.२०१७ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे..

४. नवेगांव -नागझिरा आणि मेळघाट या दोन व्याघ्र प्रकल्पांर्तगत विशेष व्याघ्र संरक्षण दलाची स्थापना करण्यासाठी २२४ अस्थायी पदावर होणारा खर्च २४०६-वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवांचे संवर्धन पंचवार्षिक योजनांतर्गत योजना केंद्र पुरस्कृत योजना, (००) ०४ व्याघ्र प्रकल्प (६० टक्के) (२४०६ १२४३) व २४०६, वनीकरण व वन्यजीवन ११० वन्यजीवांचे संवर्धन पंचवार्षिक योजनांतर्गत योजना राज्य योजना (००) (२१) व्याघ्र प्रकल्प (४०% राज्य हिस्सा) (सर्वसाधारण) संगणक संकेतांक क्रमांक :- २४०६ ए१०२ या लेखाशीर्षाखाली सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२ /(भाग-२) /२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४, क्रमांक:- पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/विसु-१, दिनांक ११.०२.२०१६ व क्रमांक:- पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१, दिनांक २१.०९.२०१६ व क्रमांक :- पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क. दि. १०.०२.२०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०४१६२४५१७४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, serialNumber=2972090f5c611c22111cacebf1c55ba326016fa7107614a6b256203dbb7235cd, cn=Arvind Shankar Apte
Date: 2017.03.04 16:26:30 +05'30'

**( अरविंद आपटे )**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पुर्व नागपूर.
५. मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, अमरावती.
६. वनसंरक्षक तथा क्षेत्रसंचालक, नवेगांव - नागझिरा व्याघ्र प्रकल्प, गोंदिया.
७. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
८. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवड नस्ती ).

**शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक डब्ल्यूएलपी ०३.१७/प्र.क्र. ६३ /फ-१, दिनांक :- ०४ मार्च, २०१७ सोबतचे विवरणपत्र**

**(दिनांक ०१.०३.२०१७ ते ३०.०९.२०१७ या कालावधीसाठी मुदतवाढ दिलेली पदे)**

| अ.क्र | पद | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | सहाय्यक वनसंरक्षक | २ |
| २ | वनक्षेत्रपाल | ६ |
| ४ | वनरक्षक | १६२ |
| ५ | वन निरिक्षक | ५४ |
| | एकूण | २२४ |